मानव विकास कार्यक्रमांतर्गत १३ जिल्ह्यांतील निवडक २७ तालुक्यांत कौशल्य विकास व रोजगार निर्मितीविषयक योजनांना प्रशासकीय मान्यता देण्यासाठी वित्तीय अधिकाराचे विकेंद्रीकरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र: माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांक: १४ फेब्रुवारी, २०१९.**

**वाचा:-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८ दि. २२/०१/२०१८
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८, दि. १९/०५/२०१८
३) नियोजन विभाग, शुध्दीपत्रक क्र. माविका-२०१७/प्र.क.२९/का.१४१८, दि. १०/०८/२०१८.

**प्रस्तावना:-**

मानव विकास कार्यक्रमांतर्गत समाविष्ट १२५ तालुक्यांपैकी २७ तालुक्यांमध्ये विविध प्रशासकीय विभागांकडून रोजगारनिर्मिती तसेच कौशल्य विकासाच्या राबविण्यात येणारे राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय योजनांचे समन्वयन, देखरेख व नियंत्रण व्हावे यासाठी नियोजन विभागाच्या अखत्यारित “संयुक्त राष्ट्र” यांच्या सोबत झालेल्या सामंजस्य करारानुसार नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८ दि. २२/०१/२०१८ अन्वये “Action Room to Reduced Poverty” या नियंत्रण कक्षाची स्थापना करण्यात आली आहे. मानव विकास कार्यक्रमांतर्गत या २७ तालुक्यांमध्ये तालुका स्तरावर प्रस्तावित योजना कार्यक्षमपणे राबविता याव्यात यासाठी अशा तालुकास्तरावरील योजनांतर्गत प्रत्येक कामासाठी रु. ५०.०० लक्ष निधी पर्यंतचे प्रशासकीय अधिकार यापूर्वी जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्यात आले आहेत. तथापि, रोजगारनिर्मिती व कौशल्य विकास संबंधित तालुकास्तरावरील योजना राबविण्यासंदर्भात काही प्रस्ताव / योजना राबविताना रु. ५०.०० लक्ष पेक्षा जास्त खर्चाचे असल्याने असे प्रस्ताव जिल्हाधिकारी यांचेकडून संबंधित विभागीय आयुक्त यांच्या मार्फत आयुक्त मानव विकास, औरंगाबाद यांना सादर करण्यात येत आहेत व तद्नंतर आयुक्त, मानव विकास, औरंगाबाद यांचेकडून असा प्रस्ताव नियोजन विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात येत आहे. यामध्ये

कालापव्यय होऊन मानव विकास कार्यक्रमांतर्गत या २७ तालुक्यांतील तालुकास्तरीय योजनेची अंमलबजावणी होऊन उद्दीष्ट साध्य होण्यासाठी बराच विलंब होत आहे. यास्तव, तालुकास्तरीय योजनेच्या प्रशासकीय मान्यतेसाठीच्या वित्तीय अधिकाराचे अधिक विकेंद्रीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८, दि. १९/०५/२०१८ मधील "परिच्छेद ३" मधील प्रत्येक कामासाठी रु. ५०.०० लक्षच्या मर्यादेत "प्रशासकीय मान्यता" देण्याच्या वित्तीय मर्यादेपुरता सुधारित करण्यात येत असून मानव विकास कार्यक्रमांतर्गत "Action Room to Reduced Poverty" संदर्भात १३ जिल्ह्यातील निवडक २७ तालुक्यांमध्ये कौशल्य विकास व रोजगारनिर्मिती करण्यास राबविण्यात येणाऱ्या तालुकास्तरावरील योजनांबाबत, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३ / प्र.क्र.३० / २०१३ / विनियम, भाग-२, दि. १७/०४/२०१५ मधील भाग १, उप विभाग ३ अ.क्र. ४ नियम क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास असलेले "योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजूरी धरुन) अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु. ५.०० कोटीपर्यंत मान्यता देण्याचे वित्तीय अधिकार जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्यात येत आहेत.

२. जिल्हाधिकारी यांना रु. ५.०० कोटी पर्यंत अनावर्ती खर्चाला मान्यता देण्याच्या अधिकाराचा वापर करताना उपरोक्त नियम क्र. २७ (२) (अ) समोर स्तंभ क्र. ६ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटी लागू राहतील.

३. जिल्हाधिकारी यांना रु. ५.०० कोटी पर्यंत अनावर्ती खर्चाला मान्यता देण्याचा अधिकार हे या आदेशाच्या दिनांकापासुन दि. ३१/०३/२०२० पर्यंत अंमलात असतील.

४. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१७/प्र.क्र.२९/का.१४१८, दि. १९/०५/२०१८ व नियोजन विभाग, शुध्दीपत्रक क्र. माविका-२०१७/प्र.क.२९/का.१४१८, दि. १०/०८/२०१८ अन्वये मानव विकास कार्यक्रमाच्या बाबतीत विहित केलेली मार्गदर्शक सूचनेतील इतर तरतूदी यापुढेही लागू राहतील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. २१/२०१९/विनियम, दि. १९/१२/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१४१४४५०४७५१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2019.02.14 17:19:44 +05'30'

**(वि.फ. वसावे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) याचे खाजगी सचिव.
४) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) याचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
११) आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद.
१२) विभागीय आयुक्त, (सर्व).
१३) जिल्हाधिकारी, (सर्व).
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व).
१५) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१६) संचालक, लेखा व कोषागारे,महाराष्ट्र शासन, मुंबई.
१७) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, (सर्व).
१८)अधिदान व लेखाधिकारी, महाराष्ट्र शासन, मुंबई.
१९) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, (सर्व).
२०) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व).
२१) सर्व सहसचिव /उपसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) निवड नस्ती / कार्यासन १४१८.